अधिक्षक अभियंता, कृष्णा पाणी तंटा लवाद विशेष कक्ष, पुणे या कार्यालयाचे सर्वंकष नियंत्रण प्रशासकीय व तांत्रिक दृष्ट्या मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे यांच्याकडे सोपविण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्रमांकः आढावा-२०२१/प्र.क्र.३२/२०२१/आस्था (पुनर्रचना)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- १२ ऑक्टोबर, २०२१

वाचा:-

१) जलसंपदा विभाग, शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण-१२०२ / ८१७ / आ (मंत्रालय), दि.१६.०७.२००३
२) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांकः आढावा - १००३ / २४५ / २००३ / आ.(प्रशि.), दि.२३.०७.२००३
३) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांकः मांडवी - २०१० / प्र.क्र.३२७ / १०/जसंनि, दि.०८.११.२०११
४) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांकः मांडवी - २०१३ / प्र.क्र.९९ / २०१३/जसंनि, दि.३१.०५.२०१३
५) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण - १४१६ / प्र.क्र.१५६ / आ (वर्ग-१) दि.३१.०५.२०१६

प्रस्तावना :-

कृष्णा पाणी वाटप तंटा लवादाचे पुनर्विलोकन करण्यासाठी केंद्र शासनाकडून स्थापन करण्यात आलेल्या नवीन कृष्णा पाणी तंटा लवादासमोर महाराष्ट्र शासनाची बाजू समर्थपणे मांडण्यासाठी, राज्याची सक्षम यंत्रणा त्वरित कार्यान्वित करण्याच्या दृष्टीने जलसंपदा विभाग, शासन निर्णय, दि.२३.०७.२००३ अन्वये कृष्णा पाणी वाटप तंटा लवाद विशेष कक्ष स्थापन करण्यात आला आहे. तसेच जलसंपदा विभाग,शासन निर्णय, दि. १६.०७.२००३ अन्वये कृष्णा खोरे सिंचन विकास महामंडळातील मुख्य अभियंता यांचे पद रद्द करुन ते पद कृष्णा पाणी वाटप तंटा लवादाच्या कामासाठी मुख्य अभियंता (कृष्णा पाणी वाटप तंटा लवाद) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय येथे स्थलांतरीत करण्यात आले आहे. सदर कक्षाच्या दैनंदिन कामाचे नियंत्रण महामंडळ,

पुणे अंतर्गत मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे यांच्याकडे व सर्वंकष नियंत्रण शासन स्तरावरुन मुख्य अभियंता (कृष्णा पाणी वाटप तंटा लवाद) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे सोपविण्यात आले आहे.

२. तद्नंतर पर्यावरण मान्यता, वन प्रस्ताव, केंद्रीय जल आयोग मान्यता, AIBP/RRR सारख्या योजनांतून केंद्रीय अर्थ सहाय्य मिळविणे तसेच नदी जोड प्रकल्प, पाणी विषयक लवाद अशा जलसंपदा विभागातील विविध विषयांबाबत केंद्र शासनाशी समन्वय साधणे, केंद्र शासनाशी संबंधीत विषय प्रभावीपणे मांडणे आणि पाठपुराव्यामध्ये सातत्य राहाण्याकरीता जलसंपदा विभाग, शासन निर्णय, दि.३१.०५.२०१६ अन्वये मुख्य अभियंता (कृष्णा पाणी वाटप तंटा लवाद) व सह सचिव, या पदाचा दर्जा उंचावून सचिव (प्रकल्प समन्वय) हे पद निर्माण करण्यात आले आहे.

३. कृष्णा पाणी वाटप तंटा लवाद विशेष कक्षांतर्गत कृष्णा पाणी तंटा लवाद - २ चा अंतिम अहवाल दि.३०.१२.२०१० रोजी जाहिर झाला असून सदर निर्णयाबाबत, आंतरराज्य नदी पाणी तंटा अधिनियम १९५६ मधील कलम ५ (३) अंतर्गत महाराष्ट्रासह अन्य राज्यांनी व केंद्र सरकारने लवादाकडे स्पष्टीकरण याचिका सादर केल्या आहेत. लवादाकडून राज्यांच्या संदर्भ याचिकांची सुनावणी पूर्ण झाल्यानंतर त्यावर स्पष्टीकरणात्मक / मार्गदर्शनार्थ अहवाल व अंतिम सुधारित निर्णय कलम ५ (३) अंतर्गत दि.२९.११.२००३ रोजी जाहीर झाला आहे.

४. तसेच महादयी पाणी तंटा लवादापुढे सर्व राज्यांची निवेदने, उत्तर, प्रत्युत्तर दाखल करण्याची कार्यवाही पूर्ण झाली आहे. राज्यातर्फे साक्षीदारांची विविध विषयावरील प्रतिज्ञापत्रे दाखल होवून त्यानुसार तीन राज्यांच्या साक्षीदारांच्या साक्षी व उलट तपासणी पूर्ण झाली आहे. तसेच फेब्रुवारी, २०१८ मध्ये लिखीत तसेच तोंडी युक्तीवाद देखील पूर्ण झाला आहे. आंतरराज्य नदी पाणी तंटा अधिनियम १९५६ मधील कलम ५ (२) अन्वये महादयी पाणी तंटा लवादाचा निर्णय दि.१४.०८.२०१८ रोजी जाहिर झाला असून केंद्र शासनाने दि.२७.०२.२०२० रोजी सदर निर्णय अधिसूचित केला आहे. महादयी पाणी तंटा लवादाने दि.१४.०८.२०१८ रोजी दिलेल्या निर्णयावर मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुमती याचिका दाखल करण्याची कार्यवाही कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांच्यामार्फत करण्यात आली असून याबाबतची न्यायालयीन प्रक्रीया सुरु आहे. ज्या प्रमाणे महादयी तंटा लवादाचा निर्णय अंतिम झाल्यानंतर पुढील न्यायालयीन कामकाज कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांच्यामार्फत हाताळण्यात येत आहे त्याच

धर्तीवर कृष्णा पाणी तंटा लवाद - २ संदर्भातील न्यायालयीन प्रकरणे कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांच्यामार्फत हाताळणे आवश्यक आहे. त्याकरिता अधीक्षक अभियंता, कृष्णा पाणी वाटप तंटा लवाद, विशेष कक्ष, पुणे या कार्यालयाचे सर्वंकष (Overall) नियंत्रण प्रशासकीय व तांत्रिक दृष्ट्या कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांच्या अंतर्गत मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे यांच्या नियंत्रणाखाली सोपविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

अधिक्षक अभियंता, कृष्णा पाणी वाटप तंटा लवाद, विशेष कक्ष, पुणे या कार्यालयाचे सर्वंकष (Overall) नियंत्रण प्रशासकीय व तांत्रिक दृष्ट्या कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांच्या अंतर्गत मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे यांच्याकडे सोपविण्यात येत आहे.

२. राज्य शासनाची बाजू लवादासमोर समर्थपणे मांडण्यासाठी किंवा इतर प्रयोजनार्थ केंद्र शासनाशी व मा. सर्वोच्च न्यायालयाशी करण्यात येणारा पत्रव्यवहार शासनाच्या मान्यतेने करण्यात यावा.

३. कृष्णा पाणी तंटा लवाद कक्ष, पुणे कार्यालयातील अधिकारी/ कर्मचारी यांचे वेतन व भत्ते आणि इतर अनुषंगिक बाबी यावर होणारा खर्च पुर्वीच्या कार्यपध्दती प्रमाणेच राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०१२१४५३३८३६२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Digitally signed by Rakhi Sachin Chavan
Date: 2021.10.12 14:57:14 +05'30'

**( राखी चव्हाण )**

**अवर सचिव, जलसंपदा विभाग**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२) मा.सभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा.उपसभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा.उपाध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद व संसद सदस्य,
८) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
११) मा. मंत्री (खारभूमी) यांचे खाजगी सचिव
१२) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक
१३) मा.राज्यमंत्री (खारभूमी) यांचे स्वीय सहायक
१४) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१५) अपर मुख्य सचिव/प्र.स/सचिव (ज.सं.प्र. व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) सचिव (ज.सं.व्य. व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
१९) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/ नागपूर
२०) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१) महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षा (मेरी), नाशिक.
२२) सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
२३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
२४) मुख्य अभियंता (जसं, जलसंपदा विभाग, पुणे.
२५) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
२६) आंतर वित्तीय सल्लागार व सह/उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२७) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२८) सह सचिव (सेवा)/उप सचिव (आस्था)/उप सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२९) अधीक्षक अभियंता, कृष्णा पाणी तंटा लवाद विशेष कक्ष, पुणे.
३०) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
३१) सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग.
३२) कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे.
(कार्यालयात झालेल्या बदलाची नोंद घेण्यास्तव अग्रेषित)
३३) सर्व उप अभियंता, जलसंपदा विभाग.
३४) सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३५) कार्यासन आस्थापना (पुनर्रचना) संग्रहार्थ.